**सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांना पूर्वीप्रमाणेच अपंग व्यक्ती अधिनियमातील नियम ५० नुसार नोंदणी प्रमाणपत्र देण्यासाठी तसेच त्याचे नुतनीकरण करण्यासाठी सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक ईडीडी २०१३/प्र.क्र.२०७/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ११ ऑगस्ट, २०१५

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.इडीडी १०९६/४७४३/प्र.क्र.६६६/सुधार-२,दि.७.२.१९९८.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र. इडीडी १०९६/४७४३//प्र.क्र.६६६/सुधार-२,दि.१९.८.२०००.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र. इडीडी १०९६/४७४३/प्र.क्र.६६६/सुधार-२,दि.१७.११.२०००.
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.२०७/ अक-१,दि.२७.१.२०१४.
५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.२०७/ अक-१, दि.१०.६.२०१४.

<u>प्रस्तावना</u> :

आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे अधिपत्याखालील प्रादेशिक उपायुक्त यांचे ऐवजी या विभागाच्या नियंत्रणाखालील आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांना अपंग व्यक्ती ( समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५ मधील नियम ५० मधील तरतूदीनुसार नोंदणी प्रमाणपत्र देण्यासाठी तसेच त्याचे नुतनीकरण करण्यासाठी सक्षम प्राधिकारी म्हणून पुन: घोषित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

केंद्र शासनाकडून अपंग व्यक्ती ( समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५ मधील तरतूदी दि.१.१.१९९६ पासून लागू करण्यात आलेल्या आहेत. सदरील अधिनियमातील तरतुदींची राज्य शासनाने माहे फेब्रुवारी, १९९६ पासून अंमलबजावणी सुरु केलेली आहे. तसेच सदरील अधिनियमातील कलम ६०(१) अन्वये संदर्भीय शासन निर्णय दि.१९.८.२००० अन्वये स्वतंत्र अपंग कल्याण आयुक्तालयाची स्थापना करण्यात येवून आयुक्त, अपंग कल्याण यांची नेमणूक करण्यात आली.

२. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचेकडील कामाचा भार विचारात घेऊन त्यांच्या ऐवजी आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे ऐवजी या विभागाच्या नियंत्रणाखालील प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांना अपंग व्यक्ती ( समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५ मधील नियम ५० मधील तरतूदीनुसार नोंदणी प्रमाणपत्र देण्यासाठी तसेच त्यांचे

नुतनीकरण करण्यासाठी सक्षम प्राधिकारी म्हणून संदर्भीय शासन निर्णय दि.२७.१.२०१४ अन्वये घोषित करण्यात आले होते. परंतु नोंदणी प्रमाणपत्राच्या नुतनीकरणाबाबत लोकप्रतिनिधीकडून, संस्थाचालककांकडून अनेक तक्रारी प्राप्त होत आहेत. या सर्व बाबी विचारात घेता, शासन निर्णय दि.२७.१.२०१४ व दि.१०.६.२०१४ रद्द करण्यात येत असून, **अपंग क्षेत्रात कार्य करणा-या संस्थांना नोंदणी प्रमाणपत्र देणे, प्रमाणपत्राचे नूतनीकरण करणे व नोंदणी प्रमाणपत्र रद्द करणे याबाबत सक्षम प्राधिकारी म्हणून पुन: आयुक्त, अपंग कल्याण पुणे यांना या आदेशान्वये घोषित करण्यात येत आहेत.**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र २०१५०८१११४४६४८६४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2015.08.11 14:50:48 +05'30'

(उज्ज्वल उके )
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (सा.न्या.) याचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
५) मा.प्रधान सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक
६) सर्व मंत्रालयीन विभाग,
७) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सर्व प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण विभाग,
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी/ सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण,
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवडनस्ती, अ.कं.-१.

******